ऑलिम्पिक स्पर्धामध्ये राज्यातील खेळाडूंचा सहभाग वाढविण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः क्रीडायो-२३१६/प्र.क्र.१३०/क्रीयुसे-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख : ०३ मार्च, २०१७.

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः केआरए-२०१५/प्र.क्र.२०७/क्रीयुसे-१, दि.१६.१०.२०१५.
२) आयुक्त, क्री.व यु.से.,महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र.शिक्रीपी २०२०/अप/२०१५-१६/००१९, दि.११.०४.२०१६ चे पत्र.
३) उप संचालक, क्री.व यु.से.,महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र.शिक्रीपी/तरतूद/मिऑ २०२०/अप/२०१५-१६/का-११, दि.१५.०६.२०१६ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

आंतरराष्ट्रीय स्तरावर विविध क्रीडा प्रकारांसाठी ऑलिम्पिक स्पर्धा, कॉमनवेल्थ स्पर्धा, एशियन गेम्स् इत्यादी स्पर्धांचे आयोजन करण्यात येते. सदर स्पर्धांचा कालावधी, त्यामध्ये सहभागी होणारे देश,स्पर्धांमधील क्रीडा प्रकार इत्यादी भिन्नभिन्न असतात. अशाप्रकारे आयोजित होणाऱ्या विविध स्पर्धांपैकी ऑलिम्पिक स्पर्धेमध्ये भाग घेणारे देश, त्यामध्ये आयोजित होणाऱ्या क्रीडा स्पर्धा, भाग घेणारे खेळाडू, त्यांना देण्यात येणारी पदके इत्यादी विविध बाबींचा विचार केल्यास ऑलिम्पिक स्पर्धेचे स्थान हे अत्युच्च समजण्यात येते. राष्ट्रीय स्तरावरील स्पर्धांमध्ये प्राविण्य मिळविणाऱ्या राज्यातील खेळाडूंनी आंतरराष्ट्रीय स्पर्धामध्ये यश मिळवून त्याद्वारे देशाच्या नावलौकीकामध्ये भर घालणे आवश्यक असते. जागतिक स्तरावर विविध क्रीडा प्रकारांमध्ये सुवर्ण, रौप्य किंवा कास्य पदके मिळविण्याकरिता संबंधित खेळाडूंना तीव्र स्पर्धा करावी लागते. जागतिक स्पर्धेमध्ये भाग घेणाऱ्या खेळाडूंची कारकिर्द प्रामुख्याने त्यांच्या बालपणापासून सुरु होते. ऑलिम्पिक स्पर्धेमध्ये जास्तीत जास्त पदके मिळविणाऱ्या अमेरिका, रशिया, चीन, जर्मनी, ऑस्ट्रेलिया, जपान इत्यादी देशांमध्ये विविध स्पर्धांमध्ये सर्वोच्च पदके प्राप्त करण्याच्या दृष्टीने प्रतिभावान बाल क्रीडापटूंची निवड करुन त्यांना खेळांच्या पायाभूत सुविधा, क्रीडा मार्गदर्शकांकडून प्रशिक्षण व प्रशिक्षणासाठी पुरेसे साहित्य, प्रशिक्षणाचा कृती आराखडा, खेळाडूंच्या

सकारात्मक मानसिकतेसाठी मानसोपचार तज्ञाचे मार्गदर्शन, आहार तज्ञ, मसाजिस्ट, दुखापतीवर इलाजासाठी फिजिओथेरेपिस्ट इत्यादी सुविधा उपलब्ध करुन देण्यात येतात. सदर सर्व बाबी विचारात घेऊन राज्यातील उदयोन्मुख खेळाडूंना क्रीडा विषयक आवश्यक त्या सर्व सुविधा उपलब्ध करुन देऊन त्याद्वारे आगामी ऑलिम्पिक स्पर्धांमध्ये जास्तीत जास्त पदके प्राप्त करण्याचे उद्दीष्ट ठेवण्यात आले आहे. टोकियो, जपान येथे सन २०२० मध्ये होणाऱ्या ऑलिम्पिक स्पर्धेमध्ये जास्तीत जास्त पदके मिळविण्याच्या संदर्भात कृती आराखडा तयार करण्याच्या दृष्टीने सह संचालक, क्रीडा व युवक सेवा, यांच्या अध्यक्षतेखाली (कार्यकारी समितीची स्थापना) संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. त्यानुसार टोकियो, जपान येथे सन २०२० मध्ये होणाऱ्या व त्यापुढील ऑलिम्पिक स्पर्धांसाठी राज्यातील खेळाडू घडविण्याच्या दृष्टीने आवश्यक क्रीडा विषयक सुविधा उपलब्ध करणे, प्रशिक्षण देणे इ. विविध बाबींवरील होणाऱ्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

ऑलिम्पिक स्पर्धेमध्ये भाग घेण्यासाठी नामांकित व प्रतिभावान खेळाडू तयार करणे ही प्रदीर्घ व निरंतर चालणारी प्रक्रीया आहे. ऑलिम्पिकमध्ये समाविष्ट असलेल्या खेळातील खेळाडूंची पूर्व तयारी हा महत्वाचा टप्पा मानून त्या त्या वेळेस ऑलिम्पिक पात्रतेच्या जवळपास कामगिरी करणाऱ्या तसेच कनिष्ठ गटामध्ये आंतरराष्ट्रीय स्पर्धेत भारताचे प्रतिनिधीत्व करून उत्कृष्ट कामगिरी करणाऱ्या खेळाडूंची या योजने अंतर्गत निवड करण्यात येईल. याकरीता खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी :-

**१.१ ऑलिम्पिक स्पर्धेत पदके मिळविण्याचे उद्दिष्ट साध्य होण्यासाठी दीर्घकालीन पूर्वतयारीसाठी खेळाडू केंद्रबिंदू मानून महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यातून प्रतिभासंपन्न व कौशल्यप्राप्त खेळाडू मिळण्यासाठी खेळाडू शोध मोहिम राबविणे :-**

खेळाचा व खेळाडूंचा दर्जा सतत वाढत जाणारा असावा तसेच अधिक काळ स्पर्धेत राहता यावे या दृष्टीने लहान वयातच मुलांचा खेळामध्ये सहभाग असणे आवश्यक आहे. शालेय जीवनाचा अविभाज्य घटक म्हणून खेळाचा अंतर्भाव करण्यात येईल. शालेय स्तरावर व कनिष्ठ स्पर्धांमध्ये कौशल्य दिसून येणाऱ्या मुलांची निवड करुन त्यांना मुख्य स्पर्धांमध्ये तसेच आंतरराष्ट्रीय स्पर्धांमध्ये भाग घेण्यासाठी प्रोत्साहीत व प्रशिक्षित केले जाईल. यातूनच पुढे ऑलिम्पिक स्तरावर भाग घेण्यास पात्र होऊ शकतील अशा प्रतिभावान खेळाडूंचा समूह राज्यात तयार होईल आणि राज्यात क्रीडा संस्कृतीचा उत्कर्ष होईल.

**१.२ ऑलिम्पिकमध्ये पदके मिळविण्याच्या दृष्टीकोनातून संभाव्य खेळाडूंना आवश्यक त्या मुलभूत व अत्याधुनिक सुविधा उपलब्ध करणे :-**

आतापर्यंत झालेल्या ऑलिम्पिक स्पर्धांमध्ये ज्या खेळांमध्ये राज्यातील खेळाडूंनी देशाचे प्रतिनिधीत्व केले आहे तसेच आंतरराष्ट्रीय व राष्ट्रीय स्तरावर ज्या खेळांमधील खेळाडूंनी प्रभावी कामगिरी केली आहे, अशा ऑलिम्पिकमध्ये समाविष्ट असलेल्या १६ खेळांची ऑलिम्पिक अभियानाकरिता निवड करण्यात आलेली आहे. हे १६ खेळ प्रकार पुढीलप्रमाणे आहेत - कुस्ती, हॉकी, ॲथलेक्टिस्, बॉक्सिंग, शूटिंग, सेलिंग, बॅटमिंटन, टेनिस, जलतरण, मॉडर्न पेन्टथलॉन, वेटलिफ्टिंग, सायकलिंग, आर्चरी, जिमनॅस्टिक, फेन्सींग व टेबल टेनिस. या खेळामधील क्रीडा संघटना व नामवंत खेळाडूंबरोबर चर्चा करुन खेळाडूंच्या खेळानुसार दिर्घकालीन नियोजन करण्यात आले. यावेळी असे लक्षात आले की, आपल्या खेळाडूंना उच्च दर्जाचे क्रीडा साहित्य व सुविधा मिळविण्यासाठी कष्ट घ्यावे लागतात. अद्ययावत सामुग्रीची कमतरता भासत असल्यामुळे याकरिता त्यांना तडजोड करावी लागते. उपलब्ध होणारी सामुग्री व सुविधा या आंतरराष्ट्रीय दर्जाच्या नसल्यामुळे त्यांच्या कामगिरीवर परिणाम होतो. त्यामुळे त्यांना त्यांच्या सर्वोत्तम पातळीपर्यत पोहोचविण्यासाठी आंतरराष्ट्रीय दर्जाच्या अतिउत्कृष्ट सेवा दिल्या जातील. आपल्या सर्वोत्तम खेळाडूंना त्यांचे ध्येय गाठण्यासाठी सुविधांचा अभाव जाणवू नये आणि त्यांना त्यांची सर्वोत्कृष्ट कामगिरी साध्य करता यावी. या दृष्टीने स्पोर्टस सायन्स सेंटर, फिटनेस सेंटर, फिजिओथेरपी, क्रीडा समुपदेशन, व मानसिक शास्त्र, आहार शास्त्र व वैद्यकीय सुविधा जागतिक दर्जाच्या करुन त्या खेळाडूंसाठी उपलब्ध करुन देण्यात येतील.

**१.३ या धोरणाची अंमलबजावणी प्रभावीपणे होण्यासाठी तज्ञांची कार्यकारी समिती स्थापन करुन काटेकोर पालन व नियंत्रण करणे :-**

संभाव्य खेळाडूंच्या क्रीडा मार्गदर्शकांच्या सोबत समन्वय साधून त्यांच्या नियमित प्रशिक्षण सत्रातील नियोजन, प्रशिक्षणाच्या ठिकाणात बदल करणे, वातावरणाशी मिळते जुळते घेण्याकरिता घ्यावे लागणारे प्रशिक्षण याबाबतचा अभ्यास कार्यकारी समितीव्दारे करण्यात येईल.

**१.४ स्पर्धास्तर निहाय संभाव्य खेळाडूंच्या कामगिरीचे मुल्यमापन करुन उपाययोजना करणे व संभाव्य म्हणून योजनेत नविन खेळाडूंचा समावेश करणे:-**

वेळोवेळी होणाऱ्या राष्ट्रीय स्पर्धांमध्ये राज्यातील अधिकाधिक खेळाडू सहभागी होण्यासाठी प्रयत्न करण्यात येतील. त्यांच्या तसेच जागतिक स्तरावरील आशियाई,

कॉमनवेल्थ स्पर्धांमध्ये सहभागी होणाऱ्या खेळाडूंच्या कामगिरीवर लक्ष ठेवण्यात येईल. खेळाडूंच्या कामगिरीचे मूल्यमापन केले जाईल. सातत्यपूर्व व नेत्रदिपक कामगिरी करणारे खेळाडूंची निवड या प्रक्रीयेत करण्यात येईल.

**१.५ तज्ञ समितीव्दारा संभाव्य खेळाडूंच्या नियमित प्रशिक्षणाचे व मार्गदर्शन कार्यक्रमाचे मूल्यमापन करणे :-**

सुरुवातीस संभाव्य खेळाडूंचे प्रशिक्षण त्यांच्या क्रीडा मार्गदर्शकांच्या नियंत्रणाखाली होईल. त्यांना आवश्यकतेनुसार शिवछत्रपती क्रीडा संकुल, पुणे येथे प्रशिक्षणाची सुविधा उपलब्ध करुन देण्यात येईल. त्यांच्या प्रशिक्षणाचे मुल्यांकन व चाचण्या घेऊन तज्ञ क्रीडा मार्गदर्शकांच्या सल्ल्यानुसार प्रशिक्षण व मार्गदर्शनात बदल करण्यात येईल.

**१.६ आवश्यकतेनुसार संभाव्य खेळाडूंच्या कामगिरीनिहाय परदेशी मार्गदर्शकांचे मार्गदर्शन व प्रशिक्षण उपलब्ध करुन देणे :-**

राज्यातील खेळाडूंना त्यांच्या खेळातील सर्वोत्तम कामगिरीपर्यत पोहचविण्यासाठी त्यांना देशांतर्गत तसेच परदेशी मार्गदर्शकांचे प्रशिक्षण व मार्गदर्शन उपलब्ध करुन देण्यात येईल. याकरिता खेळनिहाय परदेशातील क्रीडा संस्थांशी व क्रीडा मार्गदर्शकांशी संपर्क साधून त्यांच्यासोबत करार करण्यात येईल.

**१.७ आवश्यकतेनुसार संभाव्य खेळाडूंच्या कामगिरीनिहाय आंतरराष्ट्रीय स्पर्धांचा अनुभव येण्यासाठी स्पर्धेत सहभागी होण्यासाठी योग्य ती कार्यवाही करणे :-**

आशियाई, कॉमनवेल्थ व खेळनिहाय अशियाई अजिंक्य पद स्पर्धांपूर्वी खेळ निहाय परदेशात होणाऱ्या निवडक निमंत्रित स्पर्धेत संभाव्य खेळाडूंना सहभागी होण्यासाठी प्रोत्साहन दिले जाईल. जेणेकरुन त्यांना परदेशी खेळाडूंच्या तुलनेत सर्वांच्या कामगिरीचा अभ्यास करता येईल व या स्पर्धांच्या माध्यमातून सर्वांची कामगिरी उंचविण्यात येईल. या खेळाडूंचे अंतिम लक्ष्य ऑलिम्पिक स्पर्धेमध्ये पदक मिळविणे हे असेल.

**१.८ शैक्षणिक सुविधा / सवलत देणे :-**

स्पर्धा व नियमित प्रशिक्षण सुरु असताना खेळाडूंना शाळा व महाविद्यालयात हजर राहून अभ्यासक्रम आत्मसात करणे अवघड होते. हे खेळाडू शैक्षणिक अभ्यासक्रमात मागे राहू नयेत याकरिता त्यांना विशेष शैक्षणिक सुविधा / शिकवणी वर्ग उपलब्ध करुन देण्यात येतील. तसेच शाळा व महाविद्यालयात नियमित उपस्थित राहण्यापासून खेळाडूनिहाय सवलत देण्यात येईल.

२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांनी ऑलिम्पिक स्पर्धांमध्ये राज्यातील खेळाडूंचा सहभाग वाढविण्यासाठी दरवर्षी लागणाऱ्या तरतुदींबाबत तपशीलवार प्रस्ताव शासनास मान्यतेस्तव सादर करावा. उप संचालक (मुख्यालय), क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. या संदर्भात होणारा खर्च "मागणी क्र.ई-३ २२०४-क्रीडा व युवक सेवा,(०९) खेळाडूंना शिष्यवृत्या व पुरस्कार, (०९) (०९) राष्ट्रीय स्तरावर क्रीडा कौशल्य व तंत्र संबंधात खास शिक्षणाचा दर्जा वाढविणे (ऑलिम्पिक अभियान) ३१ सहाय्यक अनुदाने वेतनेतर, (२२०४-५३६८)" या लेखाशीर्षांतर्गत प्रत्येक आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०३१८११३७२६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=862038e0fbcf90998980c1f9241c4bdd9f61a60c9a06a5fe43c17f10b41e85f5, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2017.03.03 18:12:16 +05'30'

( कि.ल.संखे )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
६) सर्व उप संचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (संचालनालयामार्फत)
७) वित्त विभाग (व्यय ५)/अर्थ-८, मंत्रालय, मुंबई.
८) नियोजन विभाग, का-१४७१, मंत्रालय, मुंबई.
९) कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा यांचे खाजगी सचिव.
११) निवडनस्ती क्रीयुसे १.